**महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन, चर्नी रोड, मुंबई या कार्यालयाच्या इमारतीची दुरुस्ती, मजबुतीकरण व नुतनीकरण करणेबाबतच्या कामास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बालभ-२०२२/प्र.क्र.२/एस.डी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ६ जानेवारी, २०२२

**<u>संदर्भ</u>** :-१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनियम (भाग-२), दि.२०/०९/२०१९
२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५/०९/२०१९
३) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४/०६/२०२१
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४/१०/२०२१
५) संचालक, महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन, चर्नी रोड, मुंबई यांचे पत्र क्र.बाभ/दुरुस्ती/२०२१/३४४, दि.३१/१२/२०२१

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन, चर्नी रोड, मुंबई या कार्यालयाच्या इमारतीची दुरुस्ती व मजबुतीकरण तसेच नुतनीकरण करणेबाबतच्या कामास मा.मंत्री (शालेय शिक्षण) तथा अध्यक्ष, बालभवन नियामक मंडळ यांच्या अध्यक्षतेखालील नियामक मंडळाच्या दि.०१/०२/२०२१ रोजीच्या बैठकीत मंजुरी देण्यात आली. त्यानुषंगाने संचालक, महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन, मुंबई यांनी संदर्भ क्र.५ येथील दि.३१/१२/२०२१ रोजीच्या पत्रान्वये महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन, चर्नी रोड, मुंबई या कार्यालयाच्या इमारतीची दुरुस्ती व मजबुतीकरण तसेच नुतनीकरण करणेबाबतच्या अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांची तांत्रिक सहमती घेऊन अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने सदर कामास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन, चर्नी रोड, मुंबई या कार्यालयाच्या इमारतीची दुरुस्ती व मजबुतीकरण तसेच नुतनीकरण करणेबाबतच्या रु.३,७०,७१,९९४/- (रु.तीन कोटी सत्तर लाख एकाहत्तर हजार नऊशे चौऱ्यान्नव फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन, चर्नी रोड, मुंबई या कार्यालयाच्या इमारतीची दुरुस्ती व मजबुतीकरण तसेच नुतनीकरण करण्यासाठी रु.३,५०,००,०००/- (रु.तीन कोटी पन्नास लाख फक्त) इतका निधी संचालक, महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन, चर्नी रोड, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर बाबीवर होणारा खर्च मागणी क्र. ई-४, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०२, माध्यमिक शिक्षण (००) (००) (०३) महाराष्ट्र जवाहर बालभवनाचे बांधकाम (कार्यक्रम) ४२०२६२१९, ५३ मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या वर्षाच्या रु.७ कोटी या अर्थसंकल्पीय तरतूदीतुन खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी सहायक संचालक, विभागीय शिक्षण उपसंचालक कार्यालय, बृहन्मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरीत करुन धनादेशाद्वारे निधी संचालक, महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन, चर्नी रोड, मुंबई यांना सुपूर्द करावा.

५. संचालक, महाराष्ट्र राज्य जवाहर बालभवन, चर्नी रोड, मुंबई यांनी उपरोक्त कामाची निविदा प्रक्रिया सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रचलित नियमावली मधील तरतूदी नुसार करावी. तथापि, निधी प्राप्त झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामाला सुरूवात करू नये. प्रशासकीय मान्यतेपेक्षा जास्त निधी खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी. आवश्यकता भासल्यास सुधारित प्रशासकीय मान्यता घेऊन कार्यवाही करावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय दि.२०/०९/२०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-५, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत

परिच्छेदाखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद-१३४ (१) मधील तरतूदीनुसार व शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, दि.२५/०९/२०१९ मधील तरतुदीनुसार तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२४/०६/२०२१ व दि.१४/१०/२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार विभागास प्राधिकृत करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०६११३२२७८३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gaikwad Santosh Umeshrao

Digitally signed by Gaikwad Santosh Umeshrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education & Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, serialNumber=bc8833f9e213a7e4dfb9d2b071c9202ea52a04054e53b0c1bbf9e50c90a2cf5c, cn=Gaikwad Santosh Umeshrao
Date: 2022.01.06 11:40:08 +05'30'

**(संतोष गायकवाड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री/मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण, यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
७. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
८. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
९. विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई
१०. सहायक संचालक, विभागीय शिक्षण उपसंचालक कार्यालय, मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½, मुंबई/नागपूर
१२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र ½, मुंबई/नागपूर
१३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प)
१४. निवड नस्ती , एस.डी.१